**वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी अंतर्गत संशोधन विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता व निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मकृवि १२२२/प्र.क्र.१६४/७-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१/०३/२०२३

**वाचा** :- १) वित्त विभाग, अर्थसंकल्पीय भाषण सन २०२२-२३.
२) वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी यांचे क्र.जा.क्र.डीओआर/सी/७४०४/२०२३, दि.२०.०१.२०२३ रोजीचे पत्र
३) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांचे क्र. जा. क्र. मकृप/ संशोधन/ प्र.क्र.२२७/२२९/२०२२, दि.२३.०१.२०२३ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय भाषणात मा.उपमुख्यमंत्री तथा मा.मंत्री (वित्त) यांनी "वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी व डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली यांना ५० वर्षे पूर्ण होत असल्याने त्यांना संशोधनाकरिता प्रत्येकी रु.५०.०० कोटी रुपयांचा विशेष अनुदान / निधी उपलब्ध करण्यात येईल" अशी घोषणा केली होती. त्यास अनुसरुन सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता कृषि विद्यापीठांना संशोधनाकरीता कार्यक्रमावरील खर्चातंर्गतच्या लेखाशिर्षाखालील ३१-सहायक अनुदान (वेतनेतर) या बाबीखाली चारही कृषि विद्यापीठांना प्रत्येकी २५ कोटी इतका संशोधन निधी अर्थसंकल्पीत केला आहे. यासंदर्भात राज्यातील कृषि विद्यापीठांना संशोधन विषयक प्रस्ताव सादर करण्याबाबत कळविण्यात आले होते. त्यानुसार वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी या कृषि विद्यापीठाचे संशोधनविषयक एकूण रु.२५.०० कोटी रकमेचे प्रस्ताव महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांच्यामार्फत शासनास प्राप्त झालेले आहेत. त्यासअनुसरुन संशोधनासाठीच्या प्रस्तावांना मान्यता देण्याची व सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात संशोधनाकरीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील कृषि विद्यापीठातील संशोधन विषयक कार्याला गती मिळावी याकरीता वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी या कृषि विद्यापीठाच्या एकूण ८ संशोधन विषयक प्रस्तावांच्या रु.२५.०० कोटी रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | प्रकल्प | प्रकल्पाचे ठिकाण | प्रकल्पाचे उद्दिष्ट | प्रकल्प राबविणारी संस्था | प्रकल्प किंमत (रुपये लाखात) |
|---|---|---|---|---|---|
| १. | बी.टी.कापूस बीयाण्या संदर्भातील समस्या निवारण प्रयोगशाळा, नांदेड | कापूस संशोधन केंद्र, नांदेड | १. मराठवाडा विभागातील बी.टी. कापूस उत्पादक शेतकऱ्यांच्या बी.टी. कापसाविषयी तक्रारीच्या समस्या सोडविण्यासाठी प्रयोगशाळा स्थापन करणे.<br>२. शेतकरी व कृषि विभागामार्फत प्राप्त कपाशीच्या नमुन्यात बी.टी. जनुकाचे किमान मर्यादा पातळीत असण्याबाबत तपासणी करणे.<br>३. बी.टी.जनुक स्थानांतरीत कपाशीच्या सरळ वाणांची (Cry १ Ac) निर्मिती करणे. | वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी | २५५.०० |
| २. | पीक आणि प्रजोत्पती (Genotype) मधील सुक्ष्म हवामान प्रयोगशाळा, परभणी | अखील भारतीय समन्वयीत कृषि हवामानशास्त्र संशोधन प्रकल्प, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी | १. विविध पीके आणि प्रजोत्पत्ति (Genotype) मधील सूक्ष्म हवामान घटकांचा अभ्यास करणे.<br>२. मिथेन उत्सर्जन, उर्जा संतुलन, रेडिएशन फ्लक्स, कार्बन डायऑक्साइड आणि ग्रीन हाऊन इफेक्टचा अभ्यास करणे.<br>३.उच्च कार्बन डायऑक्साइड व तापमानाखाली विविध पिकांच्या वाणांच्या मूल्यमापनाचा अभ्यास करणे. | वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी | १७०.०० |
| ३. | अत्याधुनिक जैवतंत्रज्ञान प्रयोगशाळा, लातूर | विलासराव देशमुख कृषि जैवतंत्रज्ञान महाविद्यालय, लातूर | १.अत्याधुनिक उपकरणे सुविधा निर्मिती, कृषि व फळपिकांचे DNA फिंगरप्रिंट व जनुकीय शुद्धता चाचणी सह जनुकीय रुपांतरित वाणांची चाचणी व आधुनिक जैवतंत्रज्ञान शिक्षण व संशोधनास चालना व बळकटीकरण करणे.<br>२. कृषि व फळ, पालेभाजी पिकेआधारित वाणांसाठी जनुकीय रोग | वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी | ५८५.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | निदान प्रणाली, जनुकीय शुद्धता व विषाणू चाचणी विकसित करणे.<br>३. जैवतंत्रज्ञान क्षेत्रामधील नाविन्यपूर्ण तंत्रज्ञानाचे व्यावसायिकरण करणेसाठी सरकारी व खाजगी संस्था व उद्योग यांच्यामध्ये समन्वय साधने. | | |
| ४. | जैविक औषधी निर्मिती प्रयोगशाळा, औरंगाबाद | राष्ट्रीय कृषि संशोधन प्रकल्प, औरंगाबाद | १.जैविक किड व रोग नियंत्रण पद्धतीचा प्रसार व प्रचार शेतकऱ्यांत करणे.<br>२. शेतकऱ्यांना विविध गुणवत्तापुर्ण जैविक किड व रोगनाशके उपलब्ध करुन देणे.<br>३. उत्तम प्रतिच्या गुणवत्तापुर्ण जैविक किड व रोग नाशकाची निर्मिती करणे. | वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी | ३५६.०० |
| ५. | जैविक खते निर्मिती प्रयोगशाळा, औरंगाबाद | राष्ट्रीय कृषि संशोधन प्रकल्प, औरंगाबाद | १.मोठ्या प्रमाणात गुणवत्तापूर्ण विविध जैव खताची उत्पादन सुविधा स्थापन करणे.<br>२.जैव खताच्या वापरासंबंधी शेतकऱ्यांना मार्गदर्शन करणे.<br>३.जैव खताच्या वापराबाबत शेतकऱ्यांत जनजागृती वाढवणे. | वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी | १६०.०० |
| ६. | स्वयंचलीत माती परिक्षण प्रयोगशाळा, परभणी | मृदविज्ञान व कृषि रसायनशास्त्र विभाग, कृषि महाविद्यालय, परभणी | १. स्वयंचलित उपकरणाद्वारे माती, पाणी, उती व खते यांच्या रासायनीक गुणधर्माचे पृथ:करण करणे.<br>२. भौगोलीक माहिती प्रणाली आधारीत जमिनीचे आरोग्य व शाश्वत शेती करीता निर्णय समर्थ प्रणाली तयार करणे. | वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी | २७०.०० |
| ७. | वनस्पती आरोग्य चिकित्सा प्रयोगशाळा, परभणी | वनस्पती रोगशास्त्र विभाग, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी | १.वनस्पतींना हानिकारक असलेल्या विविध सुक्ष्म जीवजंतूंची (उदा.बुरशी, जीवाणू, विषाणू इ.) ओळख पटविणे.<br>२.वनस्पती रोग नियंत्रणासाठी वापरण्यात येणाऱ्या विविध बाबीचे पृथक्करण करणे.<br>३. वनस्पती रोग विषयक तांत्रिक व शास्त्रीय मार्गदर्शन करणे.<br>४. इतर प्रयोगशाळेतून प्राप्त झालेल्या निष्कर्षांचा अभ्यास करुन खात्री करणे. | वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी | ३१२.०० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ८. | सीताफळ संशोधन व प्रक्रिया प्रयोगशाळा, अंबाजोगाई | सीताफळ संशोधन केंद्र, अंबाजोगाई | १. सीताफळाच्या विविध जातीचा संग्रह करणे, अभ्यासणे आणि जतन करणे.<br>२. सीताफळ फळपिकाचे लागवडीचे आणि उत्पादनाचे आधुनिक तंत्र विकसीत करणे.<br>३. अवर्षणात आणि तापमानात टिकाव धरणाऱ्या वाणांचा शोध घेणे.<br>४.सीताफळातील योग्य रुट स्टॉकचा शोध घेणे.<br>५. सीताफळाबरोबर इतर सीताफळ वर्गीय पिकांचा जास्त उत्पादनासाठी अभ्यास करणे.<br>६.विविध रोग व किडीचे व्यवस्थापन व नियंत्रण करणे.<br>७. रोगमुक्त रोपांची पैदास करणे. | वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी | ३९२.०० |

**२.** सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी या कृषि विद्यापीठास संशोधनाकरीता एकूण रुपये ८४०.०० लाख (अक्षरी रुपये आठ कोटी चाळीस लाख) एवढे अनुदान वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**३.** या प्रित्यर्थ होणारा खर्च सन २०२२-२३ मध्ये मंजूर झालेल्या अनुदानाखाली खालील लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

मागणी क्र. डी-३
०१ पीक संवर्धन
१२० इतर संस्थाना सहाय्य
(००)
(०१)(०९) वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम)
३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)
लेखाशिर्ष (२४१५ ०१०५)

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३३१२३०४४६९३०१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

UMESH NARAYAN CHANDIWADE

Digitally signed by UMESH NARAYAN CHANDIWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CCBE80FCC6B64503B4E8B1269BD88D631F3F3C2BEF6E1CA70CC9A4E30954011F, cn=UMESH NARAYAN CHANDIWADE
Date: 2023.03.31 23:10:32 +05'30'

**(उमेश चांदिवडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा.प्रधान सचिव (कृषि), यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. सदस्य सचिव तथा महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
५. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.
६. कुलगुरु, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी.
७. संशोधन संचालक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी.
८. उपविभागीय कृषि अधिकारी, परभणी.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी.
१०. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
११. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१२. जिल्हा लेखा परिक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, परभणी.
१३. वित्त विभाग (व्यय १ / अर्थसंकल्प - १३ / अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१४. कक्ष अधिकारी, कार्यासन क्रमांक - २अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१५. कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.